निरुपयोगी, दुरुस्ती न होण्याजोग्या शासकीय भांडार वस्तु, यंत्रसामुग्री, वाहने इत्यादी निर्लेखित करुन त्याची विक्री / विल्हेवाट लावण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः डीएफपी-१०२०/प्र.क्र.१९/२०२०/विनियम**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १० सप्टेंबर, २०२०

वाचा -

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. डीएफपी-१०६१/१२१९५/७/विनियम, दि.२८.२.१९६२
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. डीएफपी-१०९१/प्र.क्र.४/७/विनियम, दि.१८.६.१९९१
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-१०००/प्र.क्र.३१/२००१/विनियम, दि.१५.६.२००१
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. वाहन-२०१३/प्र.क्र.३१/१३/विनियम, दि.२०.९.२०१३
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. संकीर्ण-२०१५/प्र.क्र.२६/१५/विनियम, दि.१३.८.२०१५
६) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. डीएफपी-१०१६/प्र.क्र.७/१६/विनियम, दि.२२.६.२०१६

शासन परिपत्रक -

वित्तीय अधिकार नियमपुस्तिकेन्वये सर्व प्रशासकीय विभाग / विभाग प्रमुख / प्रादेशिक कार्यालय प्रमुख / कार्यालय प्रमुख यांना निरुपयोगी, दुरुस्ती न होण्याजोग्या अथवा गरजेपेक्षा अतिरिक्त असलेल्या शासकीय भांडार वस्तु, यंत्रसामुग्री, वाहने इत्यादी निर्लेखित करण्याबाबतचे वित्तीय अधिकार देण्यात आलेले आहेत. त्यानुसार विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन निर्लेखन करणे आवश्यक आहे. तसेच निर्लेखित केलेल्या सामानाची विक्री / विल्हेवाट करण्याबाबत वित्त विभागाने वेळोवेळी मार्गदर्शक सूचना निर्गमित केलेल्या आहेत. तरी देखील शासनाच्या विविध शासकीय / निमशासकीय कार्यालयांकडून निर्लेखनाची कार्यवाही वेळीच केली जात नसल्याची बाब शासनाच्या निदर्शनास आली आहे. त्यामुळे शासकीय / निमशासकीय कार्यालयाच्या परिसरात मोठया प्रमाणात निर्लेखनासाठी प्रलंबित असलेले व निर्लेखित केलेले परंतु विल्हेवाट न लावलेले साहित्य जमा झाल्याचे दिसून येते. सदर साहित्यामुळे कार्यालय व परिसरात मुक्त वावर करण्यास प्रतिबंध होतो तसेच कार्यालय परिसर अस्वच्छ दिसतो. तसेच अश्या प्रकारच्या साहित्यामुळे आग प्रतिबंधक उपाययोजना कामात अडथळा होऊन कार्यालयाच्या सुरक्षिततेलाच धोका निर्माण होण्याची शक्यता असते.

२. उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेता, शासकीय भांडार वस्तु, यंत्रसामुग्री, वाहने इत्यादी निर्लेखित करुन त्याची विक्री / विल्हेवाट लावण्याबाबत खालीलप्रमाणे सूचना पुन्हा एकदा देण्यात येत आहेत.

१) प्रशासकीय विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालये यांनी विहीत कार्यपध्दतीचा अवलंब करुन निर्लेखनाची कार्यवाही पुढील २ महिन्यात पूर्ण करावी.

२) निर्लेखित वस्तुंच्या विक्रीतून जमा होणारी रक्कम शासन जमा करावी.

३) वरीलप्रमाणे कार्यवाही करुन कार्यालये / कार्यालय परिसर स्वच्छ राहील याची दक्षता घ्यावी.

४) उपरोक्त प्रमाणे कार्यवाही करुन प्रशासकीय विभागांनी त्यांच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय कार्यालयांच्या माहितीसह त्याबाबतचा एकत्रित अनुपालन अहवाल १५ नोव्हेंबर, २०२० पूर्वी वित्त विभागास सादर करावा. क्षेत्रिय कार्यालयांनी त्यांचे अहवाल परस्पर वित्त विभागाकडे सादर करु नयेत.

| अ.क्र. | कार्यालयाचे नांव | निर्लेखित केलेल्या सामुग्रीचा तपशील | निर्लेखन आदेशाचा क्रमांक / दिनांक | विक्रीचा दिनांक | प्राप्त रक्कम (रुपये) | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| | | | | | | |

५) सदर परिपत्रकातील सुचनांनुसार कार्यवाही न झाल्यास सदर बाबीची गंभीर दखल घेऊन प्रशासकीय विभागांनी, विभाग स्तरावर व क्षेत्रिय स्तरावर विलंबास जबाबदार असणाऱ्या अधिकाऱ्यांवर शिस्तभंगाची कारवाई करावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९१०१५१९००७४०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

INDRAJEET SAMBHAJI GORE

Digitally signed by INDRAJEET SAMBHAJI GORE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=6015944fe7d58a83f4a54c43147b5da1e34861e2984e9f793b66f7249aaa9c1a, postalCode=400032, street=Y-5/66,GOVERNMENT COLONY,MUMBAI, serialNumber=d4994742192306fcc1dea9aadd3810639506519fa652b919767b98b04e905a18, ou=FINANCE DEPUTY SECRETARY, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=INDRAJEET SAMBHAJI GORE
Date: 2020.09.10 15:20:21 +05'30'

**( इंद्रजित गोरे )**
शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
२. सर्व सन्माननीय विधान परिषद /विधानसभा व संसद सदस्य,
३. मा. राज्यपाल यांचे सचिव,
४. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
५. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
६. सर्व मा. मंत्री व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
७. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
८. मंत्रालयाच्या सर्व प्रशासनिक विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख
९. प्रबंधक, उच्च न्यायालय (मुळ शाखा / अपील शाखा), मुंबई
१०. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई,
११. महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर,
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
१४. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
१५. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१६. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

१७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१८. महाराष्ट्र राज्य महिला आयोग, मुंबई
१९. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२०. प्रमुख न्यायाधीश, कुटुंब न्यायालय, पुणे / नागपूर / औरंगाबाद / अकोला / अमरावती / ठाणे / नाशिक / सोलापूर / मुंबई,
२१. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
२२. सर्व विभागीय आयुक्त,
२३. सर्व जिल्हाधिकारी,
२४. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
२६. सह संचालक, लेखा व कोषागारे, कोकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर,
२७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ,
२८. संचालक, स्थानिक निधी लेखा परीक्षा, कोकणभवन, नवी मुंबई,
२९. सह संचालक, स्थानिक निधी लेखा परीक्षा, कोकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर,
३०. सर्व कोषागार अधिकारी,
३१. वित्त विभागातील सर्व कार्यासने,
३२. निवड नस्ती (विनियम), वित्त विभाग.

**************